अमरावती येथे १ अतिरिक्त कौटुंबिक न्यायालय स्थापन करणे व त्याकरीता अस्थायी पदे निर्माण करणेबाबत.

# महाराष्ट्र शासन

**विधि व न्याय विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : कौटुंन्या-१११६/प्र.क्र.५९(भाग-१)/का-९**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक: ०९ मे, २०२३

**वाचा:-**१) विधि व न्याय विभाग शासन निर्णय क्र. एफसीसी१००२/४१६(१०३)नऊ, दि.०६.०१.२००९

२) मा.उच्च न्यायालयाचे पत्र क्र.B(W)A-६८०४ of १९९२/७८३/१४६०१, दि.३०.०६.२०२१.

३) मा.उच्च न्यायालयाचे पत्र क्र.B(W)A-६८०४ of १९९२/१८२३/३४४५४, दि. २५.०८.२०२२

४) वित्त विभागाच्या दि. ३०.१२.२०२२ रोजीच्या पत्रान्वये प्राप्त उच्चस्तरीय सचिव समितीच्या दि.१३.१२.२०२२ रोजीच्या बैठकीचे कार्यवृत्त.

**प्रस्तावना :-**

कौटुंबिक न्यायालय, अधिनियम १९८४ च्या कलम ३ अन्वये मा. उच्च न्यायालयाच्या सहमतीने १० लक्ष किंवा अधिक लोकसंख्या असलेल्या शहरी/नागरी प्रदेशाकरीता कौटुंबिक न्यायालये स्थापन करण्याची तरतूद आहे. त्यानुसार, संदर्भ क्र. १ येथील दि.०६.०१.२००९ रोजीच्या शासन निर्णयान्वये अमरावती येथे १ कौटुंबिक न्यायालय स्थापन करण्यास मान्यता देण्यात आली होती. सदर न्यायालय हे दि.२९.११.२००९ पासून कार्यान्वित झाले आहे. सदर न्यायालयातील कौटुंबिक विवादांची प्रलंबित प्रकरणांची संख्या विचारात घेऊन मा. उच्च न्यायालय, मुंबई यांनी संदर्भ क्र. २ येथील पत्रान्वये अमरावती येथे १ अतिरिक्त कौटुंबिक न्यायालय स्थापन करणेबाबतचा प्रस्ताव शासनास सादर केला होता.

सदर प्रस्तावास उच्चस्तरीय सचिव समितीने व मा. मंत्रिमंडळाने मान्यता दिली आहे. त्यानुसार अमरावती येथे १ अतिरिक्त कौटुंबिक न्यायालय स्थापन करण्याची व त्यासाठी पदनिर्मिती करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

अमरावती येथे १ अतिरिक्त कौटुंबिक न्यायालय स्थापन करण्यास याद्वारे मंजुरी देण्यात येत आहे.

२. सदर कौटुंबिक न्यायालयाकरीता खालील विवरणपत्रात दर्शविल्याप्रमाणे अस्थायी पदे निर्माण करण्यास मंजुरी देण्यात येत आहे.

**(अ) नियमित पदे**

| अ.क्र. | पदनाम | वेतनश्रेणी | पदसंख्या |
|---|---|---|---|
| १ | न्यायाधीश | न्यायिक वेतन आयोगाप्रमाणे जे-५ : १४४८४०-१९४६६० | १ |
| २ | विवाह समुपदेशक | एस-२० : ५६१००-१७७५०० | २ |
| ३ | लघुलेखक ग्रेड-१ | एस-१७ : ४७६००-१५११०० | १ |
| ४ | लघुलेखक ग्रेड-३ | एस-१४ : ३८६००-१२२८०० | १ |
| ५ | शिरस्तेदार | एस-१३ :३५४००-११२४०० | १ |
| ६ | सहायक शिरस्तेदार | एस-८ : २५५००-८११०० | १ |
| ७ | अभिसाक्ष लेखानिक | एस-६ : १९९००-६३२०० | १ |
| ८ | लिपिक | एस-६ : १९९००-६३२०० | १ |
| **एकूण नियमित पदे** | | | **९** |

**(आ) बाह्ययंत्रणेव्दारे घ्यावयाच्या सेवा**

| अ.क्र. | पदनाम | मनुष्यबळ |
|---|---|---|
| १ | बहूद्देशीय गट ड कर्मचारी (शिपाई, पहारेकरी, सफाईगार) | २ |
| २ | वाहनचालक | १ |
| **एकूण मनुष्यबळ** | | **३** |

३. बाह्ययंत्रणेव्दारे कामे करुन घेतांना शासनाकडून वेळोवेळी निर्गमित करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वांचे अनुपालन करण्यात यावे.

४. सदर अस्थायी पदांना दिनांक ३१.०८.२०२३ नंतर पुढील मुदतवाढ घेणे आवश्यक राहील.

५. याकरीता येणारा खर्च "मागणी क्र.जे-१, २०१४, न्यायदान-१०५ दिवाणी व सत्र न्यायालये-(०१)(०२) प्रमुख न्यायाधीश, कौटुंबिक न्यायालय (अनिवार्य)(दत्तमत), सांकेतांक २०१४ ०३४१" या लेखाशीर्षाखाली संबंधित वित्तीय वर्षात मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

६. सदर शासन निर्णय मा. मंत्रिमंडळाच्या मान्यतेने तसेच वित्त विभागाच्या सहमतीने व त्या विभागाच्या अनौ.सं.क्र. १८०/व्यय-५, दिनांक २३.०२.२०२३ व अनौ.सं.क्र.५७४/आ.पु.क., दिनांक ०७.१०.२०२२ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०२३०५१०१२३२१४८९१२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

NANDKISHOR LALLU MORE

Digitally signed by NANDKISHOR LALLU MORE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=LAW AND JUDICIARY DEPARTMENT,
2.5.4.20=8e6e6ef027afaf311b73f55b93d66802f7572a95024328e2d647f7ef65a9432a, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=69426D4C260E75A2AE012E47A93A468B42FD9B82A0B40FBCADEA1F0C509379CC, cn=NANDKISHOR LALLU MORE
Date: 2023.05.10 12:32:35 +05'30'

**( नंदकिशोर ल. मोरे )**
**विधि सल्लागार-नि-सह सचिव**

**प्रतः**

१. मा. राज्यपाल महोदय यांचे सचिव, राजभवन, मुंबई,
२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई,
३. मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई,
४. मा. विरोधी पक्ष नेता, विधानसभा/विधानपरिषद यांचे खाजगी सचिव, विधानभवन, मुंबई,
५. मा. मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई,
६. मा. महाप्रबंधक, मा. उच्च न्यायालय, मुंबई,
७. प्रबंधक, उच्च न्यायालय (निरीक्षणे-१), मुंबई,
८. प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, अमरावती,
९. न्यायाधीश, कौटुंबिक न्यायालय, अमरावती,
१०. महालेखापाल- एक /दोन(लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), मुंबई/नागपूर,
११. जिल्हा कोषागार अधिकारी, अमरावती,
१२. वित्त विभाग-व्यय-५/आपुक/सेवा-९,
१३. विधि व न्याय विभाग कार्यासन-२३,२४,२५,
१४. निवड नस्ती/का.९.